स्वीय सहायक / प्रशासन अधिकारी / रचना व कार्यपध्दती अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावर पदोन्नती देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन आदेश क्र. जेएलई-०३२३/प्र.क्र.४५/तुरूंग-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ जून २०२३.

संदर्भ :-

१. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव दि.२०.०२.२०२३.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. एसआरव्ही-२०१८/प्र.क्र. १५९/कार्यासन-१२, दि.०१.०८.२०१९.

शासन आदेश :-

गृह विभागाच्या अधिनस्त कारागृह विभागातील स्वीय सहायक/प्रशासन अधिकारी/रचना व कार्यपध्दती अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दि.२०.०२.२०२३ रोजी सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने गृह विभाग, शासन निर्णय दि.०६.०६.२०१५ अन्वये गठित नागरी सेवा मंडळाची बैठक दि.१८.०५.२०२३ रोजी पार पडली. सदर बैठकीतील शिफारशीस अनुसरून कार्यालयीन अधीक्षक या संवर्गातील खालील पात्र अधिकाऱ्यांना स्वीय सहायक/प्रशासन अधिकारी/रचना व कार्यपध्दती अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या पदावर तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी त्यांना पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री. योगेश ग. कुलकर्णी | खुला | मुंबई मध्यवर्ती कारागृह. |
| २ | श्री. सुरेश मो. बागुल | अ.ज. | अमरावती मध्यवर्ती कारागृह.<br>(दि.०१.०७.२०२३ रोजी पद उपलब्ध झाल्यावर) |
| ३ | श्रीमती निता महेश दळवी | खुला | कारागृह उपमहानिरीक्षक, पूर्व विभाग, नागपूर यांचे कार्यालय, नागपूर.<br>(दि.०१.०७.२०२३ रोजी पद उपलब्ध झाल्यावर) |

२. मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे दाखल विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयाच्या अधिन राहून पदे भरण्याबाबत सामान्य प्रशासन विभागाने दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निर्देशानुसार स्वीय सहायक/प्रशासन अधिकारी/रचना व कार्यपध्दती अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार सदर पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल याचिकेच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यात येत आहे.

३. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उपरोक्त अधिकाऱ्यांना नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

४. पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी पदस्थापनेच्या पदावर १५ दिवसात रुजू व्हावे. पदोन्नतीच्या पदावर रुजू होऊन कार्यभार स्विकारल्यानंतरच त्यांना स्वीय सहायक/प्रशासन अधिकारी/रचना व कार्यपध्दती अधिकारी, गट-ब (राजपत्रित) या संवर्गाच्या वेतनाचे लाभ अनुज्ञेय राहतील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संकेतांक २०२३०६२८१७३२१२६८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2023.06.28 17:33:04 +05'30'

**( विनायक स. चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**.

**प्रत,**

१. मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर पोलीस महासंचाकलक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. विशेष पोलीस महानिरीक्षक (मुख्यालय), अपर पोलीस महासंचाकलक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालय, पुणे.
६. कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद/ दक्षिण विभाग, मुंबई/पूर्व विभाग, नागपूर/पश्चिम विभाग, पुणे.
७. प्रधान महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई/नागपूर.

८. महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/गडचिरोली.

१०. संबंधित अधिकारी (मार्फत अपर पोलीस महासंचाकलक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे)

१०. निवडनस्ती/तुरूंग-१.